**मुंबई विकास विभाग चाळीतील वाणिज्यिक वापराकरीता असलेल्या गाळयांची तथा स्टॉलची भाडेवाढ करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन.

गृहनिर्माण विभाग,

शासन निर्णय क्रमांक विविचा २००१/प्र.क्र.१२०(भाग-२)/गृनिप-१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ३ ऑक्टोबर, २००१.

वाचा :- इंग्रजी शासन निर्णय क्रमांक इडीसी १०६८/४०३२८/ई, दि. ३१ जुलै, १९६९.

**प्रस्तावना :-** मुंबई विकास विभाग चाळीतील निवासी/अनिवासी तथा स्टॉलचे भाडे दि. ३१.७.१९६९ च्या शासन निर्णयाव्दारे ठरविण्यांत आलेले आहे. तदुनंतर यात वाढ करण्यांत आलेली नाही. बी.डी.डी. चाळीवर होणारा देखभाली व दुरुस्तीचा खर्च दर वर्षी सुमारे रु.६ कोटी इतका येतो. हा खर्च कमी करण्याच्या दृष्टीकोनातून बी.डी.डी. चाळीतील वाणिज्यिक वापराकरीता ( कमर्शिअल) असलेले अनिवासी गाळे तथा स्टॉलचे भाडेवाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** मुंबई विकास विभाग चाळीतील वाणिज्यिक वापराकरीता (कमर्शिअल) असलेले अनिवासी गाळे संस्था, अधिकृत स्टॉल व दंडनीय आकाराने वापरात असलेले अनधिकृत स्टॉल यांची भाडेवाढ करण्याचे शासनाने निर्णय घेतलेला आहे. ही भाडेवाढ खालीलप्रकारे असेल.

| अ.क्र | गाळयाचा प्रकार | गाळयाची संख्या | सध्याचे द.म. भाडे + विद्युत आकार | प्रस्तावित मासिक भाडयाचा दर (प्रती चौ.फु.) | प्रस्तावित एकूण दरमहा + विद्युत आकार |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | अनिवासी गाळे<br>अ) दुकानी | ३३३ | ४०+२=४२<br>४५+२=४७<br>५०+२=५२<br>६५+२=६७ | ३.०० | ४८०+५= ४८५ |
| | ब) इतर भटारखाना, भांडाररुम, तालीम | ७३ | २५+२=२७ | २ | ३२०+५=३२५ |
| २. | संस्था | ३४५४ | १५+२=१७ | ०.७५ | १२०+५=१२५ |
| ३. | अधिकृत स्टॉल/ जागा (सुमारे १०X६) | १७५ | प्र.चौ.फु. २.०० | रु.५ | रु.३०० सुमारे |
| ४. | दंडनीय दराने असलेले अनधिकृत स्टॉल्स (सुमारे ६X८) | १०१ | २५ | रु.१० | रु.४८० सुमारे |

ही भाडेवाढ दि. १.४.२००१ पासून पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्यांत येईल.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( शं.य.सोनावणे.)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, गणपत जाधव मार्ग, वरळी, मुंबई १८.
२. व्यवस्थापक, मुंबई विकास विभाग चाळी, गणपत जाधव मार्ग, वरळी, मुंबई १८.
३. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबईकरीता, जुने जकात घर, मुंबई.
४. सचिव, सार्वजनि बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
५. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
६. मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव.
७. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे खाजगी सचिव.
८. मा. राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव.
९. गृहनिर्माण विभागातील सर्व अधिकारी.
१०. कार्यासन गृनिप-१(संग्रहार्थ)

GR 200201221658 58000-1700